सन २०१२-१३ या आर्थिक वर्षात राष्ट्रीय ग्रामीण पेयजल योजना अंतर्गत नैसर्गिक आपत्ती या घटकाखाली वितरीत केलेल्या निधीपैकी अखर्चित निधी केंद्र शासनास परत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः टंचाई २०१२/प्र.क्र. ३१४ /पापु-१४**
गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल, लोकमान्य टिळक मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ००१
तारीख: २४ जानेवारी, २०२२

वाचा :-

१) केंद्र शासनाचे (पेयजल व स्वच्छता मंत्रालय), पत्र क्रमांक : W-११०३२/०५/२०१२/Water/१६४, दिनांक ०७ ऑगस्ट, २०१२
२) समक्रमांचे शासन निर्णय, दिनांक ३०.११.२०१२, २७.१२.२०१२, २७.०३.२०१४
३) केंद्र शासनाचे (पेयजल व स्वच्छता मंत्रालय), पत्र क्रमांक : W-११०३२/०३/२०१८/Water-I, दिनांक ०६ नोव्हेंबर, २०१९

प्रस्तावना:-

केंद्र शासनाने सन २०१२-१३ या आर्थिक वर्षासाठी नैसर्गिक आपत्तीसाठी आकस्मिकता म्हणून राखून ठेवलेल्या केंद्रीय ग्रामीण पाणी पुरवठा योजनेच्या एकूण नियतव्ययातील २ टक्के या प्रमाणे रु. १५.०० कोटी इतका अतिरिक्त निधी १०० टक्के शासनाचा हिस्सा म्हणून दिनांक ०७.०८.२०१२ या आदेशान्वये महाराष्ट्र राज्यास मंजूर केलेला आहे. सदर अतिरिक्त निधीचा वापर राज्यातील टंचाई वितरण व अवर्षणग्रस्त जिल्हयातील नादुरुस्त / बंद असलेल्या ग्रामीण पाणी पुरवठा योजना दुरुस्त/ पुनर्जिवित करुन सुरळीत चालु ठेवण्यासाठी रु. १५०० लक्ष निधी उपरोक्त शासन निर्णयान्वये क्षेत्रीय कार्यालयांना उपलब्ध करुन दिलेला आहे.

सदर निधी मधून रु. १४९.५९ लक्ष इतका निधी शासन निर्णय, दिनांक २७.०३.२०१४ अन्वये निधी विभागीय आयुक्त, नागपूर यांना वितरीत केला आहे. यापैकी रु. १२५.१४ लक्ष खर्च करण्यात आले आहेत. तर उर्वरित जिल्हा परिषदा / जिल्हाधिकारी कार्यालयामार्फत रक्कम रु. २४.४५ लक्ष चलनाद्वारे शासन खाती जमा केली आहे. सदर अखर्चित निधी धनकर्षाद्वारे केंद्र शासनास परत करणे आवश्यक आहे. या प्रयोजनासाठी निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

केंद्र शासनाने सन २०१२-१३ या आर्थिक वर्षासाठी नैसर्गिक आपत्तीसाठी वितरीत केलेल्या निधीपैकी राज्य शासनाच्या एकत्रित निधीत जमा केलेली अखर्चित रक्कम रु. २४,४५,०५८/- केंद्र शासनास परत करण्यासाठी उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

सदर निधी लेखाशिर्ष जल जीवन मिशन या केंद्र पुरस्कृत कार्यक्रमांतर्गत सन २०२१-२२ या आर्थिक वर्षातील सर्वसाधारण (राज्य हिस्सा) घटकाचा मागणी क्रमांक वाय-०२, लेखाशिर्ष २२१५, पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१, पाणी पुरवठा, १०२ ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम (०२) जिल्हा परिषदांना योजनांतर्गत अनुदाने (०२) (१५) नळाद्वारे पाणी पुरवठा योजना राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम यासाठी अनुदान (राज्यक्षेत्र), ३१ सहायक अनुदाने (वेतनेत्तर) ( २२१५ २०७१) खाली मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

सदर रक्कम आहरित करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी, अवर सचिव ( रोखशाखा), (श्री. पां.रा.खोटरे) यांना व नियंत्रक अधिकारी म्हणून उप सचिव (श्री. रा. म. गेंगजे), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

सदर रक्कम Pay and Account Officer, Department of Drinking Water and Sanitation, Ministry of Jal Shakti, Government of India, Pandit Deendayal Antyodaya Bhavan, CGO Complex Lodhi Road, New Delhi-११०००३ यांच्या नावे धनाकर्षाद्वारे केंद्र शासनास परत करण्यात यावी.

सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक २३०/१४४३, दिनांक ०८.१२.२०२१ व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ४४५/व्यय-३, दिनांक २९.१२.२०२१ च्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२२०१२४११५८५६१९२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VARSHA
GUNVANTRAO
DESHMUKH

Digitally signed by VARSHA GUNVANTRAO DESHMUKH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=318374474bdbbee0a87fa98c6ce4addbc6f40c52596bc652c9c91f0a77a35550, pseudonym=F95102CD8311B72DFCBECFA350FF3EF7BE95A559, serialNumber=B030780A012E3648CB356030F4D4BFD6DCFED5E1526059A46C087A14FE3C29A0, cn=VARSHA GUNVANTRAO DESHMUKH
Date: 2022.01.25 11:54:04 +05'30'

**(वर्षा देशमुख)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. प्रधान सचिव, (व्यय) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
२. महालेखाकार, (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई
३. महालेखाकार, (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर

४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
५. मा. मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव
६. मा. राज्यमंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव
७. अभियान संचालक, राज्य पाणी व स्वच्छता मिशन, बेलापूर, नवी मुंबई
८. सह सचिव (पापु-१४/ पापु-०४), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहायक
९. अवर सचिव (रोखशाखा), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. अवर सचिव (पापु-१०), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
११. पापु-१४ संग्रहासाठी.